९३५

**महाराष्ट्र मानव विकास मिशन**
**गठीत करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांकः ममावि-२००६/प्र.क्र.२०/का.१४१३.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ जून, २००६.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्याचा पहिला मानव विकास अहवाल सन-२००२ मध्ये प्रसिध्द झाला. या अहवालाचा अभ्यास केल्यावर मराठवाडा विभागातील व इतर काही जिल्हयांचे स्थान निम्न पातळीवर असल्याचे दिसून आले. राज्यातील मागासलेल्या जिल्हयातील मानव विकास निर्देशांकात सुधारणा घडवून आणण्यासाठी मानव विकास समिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र मानव विकास अहवाल प्रसिध्द झाल्यानंतर, 'इंदिरा गांधी इन्स्टिटयूट ऑफ डेव्हलपमेंट रिसर्च' आणि 'टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेस' या संस्थेच्या पाहणी अभ्यासाचा विचार करून राज्यातील १२ अतिमागासलेल्या जिल्हयांकरिता "महाराष्ट्र मानव विकास मिशन" गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. मानव विकास समितीची रचना आणि कार्यकक्षा पुढीलप्रमाणे असेल :-

**१. मिशनचे कार्यक्षेत्र :**

महाराष्ट्र मानव विकास मिशनचे मुख्यालय औरंगाबाद येथे असेल. महाराष्ट्र मानव विकास मिशनची नोंदणी 'सोसायटी नोंदणी कायदा' अंतर्गत करण्यात येईल.

महाराष्ट्र मानव विकास मिशनचे कार्यक्षेत्र खालील १२ जिल्हयांपुरते मर्यादित असेल. पहिल्या

टप्यात पुढील जिल्हयांचा समावेश करण्यात येईल.

| जिल्हे | जिल्हे |
|---|---|
| परभणी | धुळे |
| हिंगोली | बुलढाणा |
| जालना | वाशिम |
| उस्मानाबाद | यवतमाळ |
| नांदेड | चंद्रपूर |
| नंदुरबार | गडचिरोली |

या जिल्हयांपैकी कांही भाग निवडून त्या ठिकाणी लक्ष केंद्रित करण्याचे अधिकार मानव विकास मिशनकडे राहतील

**२. मिशनचे कार्य आणि जबाबदारी :**

(१) निवडलेल्या तालुक्यातील मानव विकासातील वेगवेगळया निर्देशांकाची सद्यःस्थिती उपलब्ध करून घेण्यासाठी पथदर्शी सर्वेक्षण घेणे.

(२) तालुका/गाव विकास समितीसाठी उत्पन्न वाढविण्याकरिता कार्यक्रम तयार करणे, प्रौढ साक्षरतेसाठी विशेष मोहिम राबवून गाव/तालुक्याच्या ठिकाणी कुशल कामगार निर्मितीसाठी आवश्यक ते प्रशिक्षण देणे, व या कुशल कामगारांनी उत्पादित केलेल्या उत्पादनासाठी बाजारपेठ निर्माण करणे, जेणेकरून तालुका/गाव पातळीवरील दरडोई उत्पन्नात भरीव वाढ होईल.

(३) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन, राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य व पोषण मिशन या सध्या कार्यरत असलेल्या दोन मिशनशी सहकार्य करून व या दोन मिशनच्या कामाच्या सद्यःस्थितीस पूरक म्हणून या मानव विकास मिशनने काम करावयाचे आहे, जेणेकरून मानव विकासाच्या निर्देशांकात भरीव वाढ होईल.

(४) मानव विकास कार्यक्रमाची अंमलबजावणी अधिक योग्य प्रकारे आणि परिणामकारक रित्या करण्याकरिता अशासकीय सेवाभावी संस्थांना सहभागी करुन घेणे व त्यांच्या सहभागाची रुपरेषा ठरविणे.

(५) जिल्हा मानव विकास समिती, तालुका मानव विकास समिती व गाव मानव विकास समितीचे कामांचे मूल्यमापन करणे किंवा करून घेणे आणि प्रशासकीय तसेच धोरणात्मक बाबीं संबंधात मार्गदर्शन करणे.

(६) राज्य शासनाच्या तसेच केंद्र शासनाच्या मानव विकासाशी संबधित सर्व प्रकारच्या योजनांचे एकात्मिक पध्दतीने संनियंत्रण करणे.

(७) मानव विकास कार्यक्रमाकरिता उपलब्ध निधीचे जिल्हानिहाय वाटप करणे. हा निधी जिल्हानिहाय उपलब्ध करुन दिलेल्या निधीव्यतिरिक्त पूरक निधी असेल.

(८) मानव विकास कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचे तज्ञ व्यक्ती किंवा संस्थांकडून सर्वेक्षण आणि मूल्यमापन करणे.

३. <u>नियामक मंडळ :</u>

महाराष्ट्र मानव विकास मिशनच्या कार्यक्रमाचा आढावा घेण्याकरिता मानव विकासाच्या अंतर्गत काही बाबीं संबधात शासन पातळीवर धोरणात्मक निर्णय घेण्याकरिता महाराष्ट्र मानव विकास मिशनच्या नियामक मंडळाची पुढीलप्रमाणे रचना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, वित्त व नियोजन | अध्यक्ष |
| २ | मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य | सदस्य |
| ३ | मा.मंत्री, महिला व बालविकास | सदस्य |
| ४ | मा.मंत्री, शालेय शिक्षण | सदस्य |
| ५ | मा.मंत्री, रोजगार व स्वयंरोजगार | सदस्य |
| ६ | मा.मंत्री, उद्योग | सदस्य |
| ७ | मा.मंत्री, कृषि | सदस्य |
| ८ | मा.मंत्री, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय | सदस्य |
| ९ | मा.मंत्री, ग्राम विकास | सदस्य |
| १० | मा.राज्यमंत्री, नियोजन | सदस्य |
| ११ | मुख्य सचिव | सदस्य |
| १२ | अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग | सदस्य |
| १३ | प्रधान सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| १४ | प्रधान सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग | सदस्य |
| १५ | प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| १६ | प्रधान सचिव, (कृषि), कृषि व पदुम विभाग | सदस्य |
| १७ | सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| १८ | सचिव, महिला व बालविकास विभाग | सदस्य |
| १९ | सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| २० | सचिव, (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| २१ | महाराष्ट्र मानव विकास मिशनचे कार्याध्यक्ष | सदस्य सचिव |

४. **महाराष्ट्र मानव विकास मिशनची रचना :**

(१) शासनाने नियुक्त केलेले सचिव श्रेणीतील किंवा तत्सम अधिकारी - कार्याध्यक्ष

(२) औरंगाबाद विभागासाठी मानव विकास निर्देशांकाशी संबंधित प्रशासकीय विभागाचे प्रादेशिक अधिकारी (एकूण ५) - सदस्य

(३) औरंगाबाद विभाग वगळता उर्वरित जिल्हयांकरिता प्रादेशिक स्तरावरील समन्वय अधिकारी (एकूण ४) - सदस्य

(४) राज्य शासनाचा प्रतिनिधी - सदस्य

(५) अशासकीय सेवाभावी संस्था (तीन प्रतिनिधी) (औरंगाबाद, विदर्भ व नाशिक विभागातील प्रत्येकी-१) - सदस्य

(६) विशेष कार्य अधिकारी (उप-आयुक्त श्रेणी) -सदस्य सचिव

याशिवाय, आवश्यकतेनुसार मिशन काही तज्ञ व्यक्तींची विशेष निमंत्रित सदस्य म्हणून नियुक्ती करु शकेल.

५. **मिशनचे अधिकार :**

(१) मानव विकास निर्देशांकाची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी निश्चित स्वरुपाचे विशेष कार्यक्रम/ योजना तयार करणे आणि शासनाकडून प्राप्त होणा-या विशेष निधीतून त्याची अंमलबजावणी करणे.

(२) कार्यक्रमात समाविष्ट बाबींना/ कार्यक्रमांना तांत्रिक आणि प्रशासकीय मंजुरी देणे.

(३) कार्यक्रमात समाविष्ट वेगवेगळया बाबींकरिता मानधनाचे दर निश्चित करणे.

(४) राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय पातळीवर काम करणा-या संस्थांच्या सहकार्याने मिशनचे कार्यक्रम प्रभावीपणे राबविणे.

(५) महाराष्ट्र मानव विकास मिशनच्या कार्यालयीन वापरासाठी जागा भाडयाने घेणे व कार्यालयीन खर्चास मान्यता देणे.

(६) मानव विकासाचे उदिष्ट साध्य करण्याकरिता वेगवेगळया विभागांच्या कार्यक्रमात काही धोरणात्मक बदल करावयाचे असल्यास त्याबाबतचा प्रस्ताव संबधित विभागास सादर करणे.

(७) मानव विकास समित्यांच्या कामकाजाची कार्यप्रणाली निश्चित करणे, अधिकार प्रदान करणे, वित्तीय कार्य पध्दती निर्धारित करणे.

(८) मिशनच्या कार्यालयाकरिता तसेच जिल्हा मानव विकास समित्यांच्या कार्यालया- करिता पदे भरण्याची मुभा मिशनला असेल. मिशनच्या कार्यालयाकरिता तसेच जिल्हा मानव विकास समित्यांच्या कार्यालयाकरिता प्रतिनियुक्तीने शासन सेवेतील अधिकारी, कर्मचारी उपलब्ध न झाल्यास ती पदे निवृत्त शासकीय/निम शासकीय अधिका-यांना नियुक्त करुन अथवा संबंधीत जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रातील नोंदणीकृत पात्र उमेदवाराकडून एक वर्षाकरिता

(९) मिशनच्या कार्यालयाकरिता आणि जिल्हा अंतर्गत गठीत करण्यात आलेल्या मानव वि समित्यांचे कार्यालयाकरिता लागणारी सर्व प्रकारची यंत्रसामुग्री, फर्निचर, लेखन साहित्य करण्याचे आणि त्यावर येणारा खर्च मिशनला उपलब्ध होणाऱ्या निधीमधून करण्याचे स अधिकार मिशनला असेल.

(१०) मिशनच्या कार्याध्यक्षांसाठी एक आणि मिशनमधील काम करणाऱ्या कर्मचारी/अधिकारी वर्गा कार्यालयीन वापराकरिता एक अशी दोन वाहने भाडयाने घेण्याचे अधिकार मिशन कार्याध्यक्षांना राहतील.

(११) मानव विकास निर्देशांक निगडित सर्व प्रकारच्या केंद्र व राज्य शासनाच्या कार्यक्रम अंमलबजावणी मानव विकास निर्देशांक सुधारण्यासाठी निवड करण्यात आलेल्या तालुक प्राथम्याने केली जावी आणि अशा प्रकारची अंमलबजावणी केली जात नसेल तर संबं विभागास निर्देश देण्याचे अधिकार मिशनला राहतील.

६. वित्तीय तरतुद खर्च करण्याचे अधिकार :

या प्रकल्पाकरिता शासनाकडून प्राप्त झालेला निधी 'महाराष्ट्र मानव विकास मिशन' या नाव राष्ट्रियकृत बँकेमधे स्वतंत्र खाते उघडून, त्या खात्यात जमा केला जाईल. हे बँक खाते रु.१०,००० पर्यत रकमेसाठी मिशनचे कार्याध्यक्ष/ सदस्य सचिव या पैकी एकाच्या स्वाक्षरीने व त्यापेक्षा जास्त रकमेसा मिशनचे कार्याध्यक्ष व मिशनचे सदस्य-सचिव यांच्या संयुक्त स्वाक्षरीने हाताळण्यात येईल. कार्यक्रमासाठी व त्याचे आवर्ती व अनावर्ती खर्चासाठी अर्थसंकल्पाद्वारे वित्तीय तरतुद करण्यात येईल.

महाराष्ट्र मानव विकास मिशनकरिता "२०५३, जिल्हा प्रशासन" या प्रधान शीर्षाखाली पुढीलप्रमा उपशीर्ष उघडण्यात आले असून या उपशीर्षाकरिता महाराष्ट्र मानव विकास मिशनचे सदस्य-सचिव आहरण-संवितरण अधिकारी असतील.

" मागणी क्रमांक : ओ-०१
२०५३, जिल्हा प्रशासन
०९३ जिल्हा आस्थापना
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,
०४ आयुक्त, औरंगाबाद
(०४)(०१) , मानव विकास निर्देशांक वृद्धी करणे (२०५३-१२३-१) दत्तमत
४१- सहाय्यक अनुदाने"

उपरोक्त उपशीर्षाखाली रू.५०.०० कोटीची तरतूद केली असून माहे एप्रिल व मे २००६ च्या कॅश फ्लोच्या नुसार रू.३.०० कोटी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

**७. प्रकल्प कालावधी :**

पहिल्या टप्यात महाराष्ट्र मानव विकास प्रकल्पाचा कालावधी ३ वर्षाचा राहील व मिशनची प्रगती पाहून आवश्यकतेनुसार पुढील २ वर्षापर्यंत वाढविता येईल.

**८. मानव विकास समित्या :**

मानव विकास कार्यक्रमाची अंमलबजावणी योग्य पध्दतीने आणि परिणामकारक रित्या करण्याकरिता जिल्हयांतर्गत पुढीलप्रमाणे मानव विकास समित्या गठीत करण्यात येत आहे. या समित्यांची रचना खालील प्रमाणे असेल.

(अ) **जिल्हा मानव विकास समिती:**

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.) | - सह अध्यक्ष |
| जिल्हा नियोजन अधिकारी | - सदस्य |
| संबधित विभागाचे जिल्हा प्रमुख. | - सदस्य |
| जिल्हा परिषदेअंतर्गत समितीमधील जिल्हा परिषदेने नामनियुक्त केलेला एक सभापती | - सदस्य |
| अशासकीय सेवाभावी संस्था (एक) | - सदस्य |
| अग्रणी बँकेचे अधिकारी | - सदस्य |
| राज्य मानव विकास समितीचा कार्यालय प्रमुख वर्ग-१ चा अधिकारी | -सदस्य-सचिव |

(ब) **तालुका मानव विकास समिती:**

| | |
|---|---|
| तहसीलदार | अध्यक्ष |
| गट विकास अधिकारी | - सह अध्यक्ष |
| बाल विकास प्रकल्प अधिकारी | - सदस्य |
| गट शिक्षणाधिकारी | - सदस्य |
| तालुका आरोग्य अधिकारी | - सदस्य |
| अशासकीय सेवाभावी संस्था (एक) | - सदस्य |
| पंचायत समितीने नामनियुक्त केलेला सभासद(एक) | - सदस्य |
| विस्तार अधिकारी, पंचायत (जिल्हा मानव विकास समितीमधील अधिकारी) | -सदस्य-सचिव |

(क) <u>**गाव मानव विकास समिती:**</u>

| | |
|---|---|
| सरपंच | - अध्यक्ष |
| सचिव, विविध कार्यकारी सोसायटी | - सदस्य |
| निर्वाचित ग्राम पंचायत सदस्य (पुरुष) (एक) | - सदस्य |
| निर्वाचित ग्राम पंचायत सदस्य (स्त्री) (एक) | - सदस्य |
| ग्राम सभेने नियुक्त केलेले गावातील तीन प्रतिष्ठीत नागरिक | - सदस्य |
| ग्रामसेवक | -सदस्य-सचिव |

**९. <u>प्रकल्प कालावधीत साध्य करावयाची उद्दिष्टये :</u>**

मानव विकास प्रकल्पाच्या माध्यमातून साध्य करावयाची उदिष्टे यामध्ये प्रामुख्याने बाल विवाह प्रतिबंध, कुटुंब नियोजन,संस्थात्मक प्रसूतीत वाढ, माता-बालक आरोग्य व पोषण, बाल मृत्यू दरात घट, शाळेतील गळतीच्या प्रमाणात घट, पटसंख्येत वाढ, साक्षरतेचे प्रमाणात व प्रौढ साक्षरतेच्या प्रमाणात वाढ, शैक्षणिक सुविधा, दरडोई वार्षिक उत्पन्नात वाढ या निर्देशांकाचा समावेश असेल. सदर निर्देशांकाची तालुका/गावातील सद्य:स्थिती आणि पुढील ३ वर्षात या निर्देशांकात होणारी वाढ, याबाबत मिशनने उद्दिष्टे ठरवून शासनाकडे सादर करावीत. ठरवून दिलेल्या उद्दिष्टांबाबत मिशन, विहीत नमुन्यात त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करेल.

१०. **कर्मचारी वृंद** :

(अ) मिशनचे कार्यालयाकरिता खालील प्रमाणे अधिका-यांची नवीन पदे निर्माण करण्यात येत आहे. सदर पदे प्रतिनियुक्तीने किंवा कॉन्ट्रॅक्ट पध्दतीने भरली जातील.

| | |
|---|---|
| शासनाने नियुक्त केलेले सचिव दर्जाचे अधिकारी (कार्याध्यक्ष) | -१ |
| विशेष कार्य अधिकारी (उप-आयुक्त श्रेणी) | -१ |
| सहायक आयुक्त (वर्ग-१ चा अधिकारी) | -१ |
| लेखाधिकारी (वर्ग-२) | -१ |
| लघुलेखक इंग्रजी आणि मराठी (प्रत्येकी १) | -२ |
| लिपीक (संगणकाचे ज्ञान असलेला) | -२ |
| शिपाई | -३ |
| **एकूण** | **-११** |

(ब) प्रत्येक जिल्हा मानव विकास समितीचे कार्यालयाकरिता खालील प्रमाणे नवीन पदे निर्माण करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| उपमुख्य अधिकारी, पंचायत (वर्ग-१ चा अधिकारी)/उपजिल्हाधिकारी | -१ |
| विस्तार अधिकारी (पंचायत) / नायब तहसिलदार | -१ |
| लिपीक (संगणकाचे ज्ञान असलेला) | -१ |
| शिपाई | -१ |
| **एकूण** | **-४** |

**११. प्रकल्प अंमलबजावणी अधिका-यांवरील करावयाच्या कार्यवाहीच्या अनुषंगाने मिशनचे प्रशासकीय अधिकार :**

(१) मानव विकासाशी निगडीत वेगवेगळया बाबींची अंमलबजावणी करणा-या सर्व शासकीय अधिका-यांना कार्यक्रमाचे अंमलबजावणी संबधात स्पष्ट निर्देश देण्याचा अधिकार मिशनला असेल. मिशनने बोलाविलेल्या बैठकांना उपस्थित राहणे, सर्व संबधीत शासकीय अधिका-यांना बंधनकारक असेल.

(२) एखाद्या अधिका-याचे किंवा विभागाचे काम असमाधानकारक आढळून आल्यास त्याबाबत मिशन आपला अहवाल संबधित विभागांच्या सचिवांना पाठवेल व त्या अहवालावर कार्यवाही करण्याची जबाबदारी संबधित विभागांवर राहील. मानव विकास कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याच्या कामात काही विभागाचे अधिकारी असहकार करत असल्याचे आढळून आल्यास, त्याबाबतचा अहवाल मिशन राज्याचे मुख्य सचिवांना पाठवेल. मानव विकासाकरिता निवडण्यात आलेल्या जिल्हयामध्ये आणि तालुक्यामध्ये कार्यक्रमाशी संबधित शासकीय पदे रिक्त असल्यास ती पदे तातडीने आणि प्राधान्यपूर्वक भरण्याबाबत मिशन संबधित विभागास विनंती करेल. आणि त्यानुसार संबधित विभागामार्फत सर्व रिक्त पदे <u>तातडीने</u> आणि <u>प्राधान्यपुर्वक</u> भरली जातील. मानव विकास कार्यक्रमाकरिता निवडण्यात आलेल्या तालुक्यामध्ये किंवा जिल्हयामध्ये कार्यक्रमाशी निगडीत अधिकारी किंवा कर्मचारी अकार्यक्षम असल्याचे आढळून आल्यास मिशन त्याबाबतचा अहवाल संबधित विभागास पाठवेल आणि मिशनच्या अहवालाच्या आधारे संबधित अधिका-याची तातडीने इतरत्र बदली करण्याबाबत संबधित प्रशासकीय विभाग कार्यवाही करेल.

(३) मानव विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबत निष्काळजीपणा दाखविणारे अधिकारी आणि कर्मचारी यांचे विरुध्द कारवाई करण्या बाबतचे अधिकार मिशनला देण्याबाबचा निर्णय गरजेनुसार मा.मुख्यमंत्र्यांचे मान्यतेनुसार वेळोवेळी घेण्यात येईल.

(४) मिशनच्या कामकाजास गती देण्याच्या दृष्टिने मिशन, आपले काही अधिकार मिशनमधील निम्नस्तरावरील अधिकाऱ्यांना प्रदान (delegate) करु शकेल.

१२. **प्रशासकीय विभागाची जबाबदारी :**

मिशनकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांवर/अहवालांवर ३० दिवसांचे आत परिपूर्ण कार्यवाही करण्याची जबाबदारी संबधित प्रशासकीय विभागाची राहील.

१३. **मिशनचे कार्याध्यक्ष व त्यांचे मानधन :**

मिशनचे कार्याध्यक्ष हे शासनाने नियुक्त केलेले, शासन सेवेतील किंवा शासन सेवेतून निवृत्त झालेले सचिव श्रेणीतील किंवा तत्सम अधिकारी असतील. शासन सेवेतून निवृत्त झालेल्या अधिका-यांची कार्याध्यक्षपदी नियुक्ती केल्यास त्यांना शासनाच्या विहित नियमानुसार मानधन देण्यात येईल.

मा.मंत्री, वित्त यांच्या सन २००६-०७ च्या अर्थसंकल्पिय भाषणात घोषित केल्याप्रमाणे श्री.के.बी. भोगे, विभागीय आयुक्त,औरंगाबाद हे मिशनचे पहिले कार्याध्यक्ष असतील.

सदर आदेश वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३३/०६/व्यय-८, दि. २०.६.२००६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. 201002091549480001

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शै. मु. अपराजित )
विशेष कार्य अधिकारी.

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, १/२, मुंबई/नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
श्री.के.बी.भोगे, कार्याध्यक्ष, महाराष्ट्र मानव विकास मिशन,
जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
सह सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव,
उप सचिव(व्यय ८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,
निवडनस्ती, का.१४१३